राष्ट्रीय मागासवर्ग आयोग, नवी दिल्ली या आयोगाचे अध्यक्ष, सदस्य आणि सदस्य सचिव यांना राज्य अतिथीच्या सुविधा देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२/मावक**
मंत्रालय विस्तारीत इमारत, पहिला मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक : १६ फेब्रुवारी, २०२३

वाचा : (१) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसजीआर १००२/६८८/प्र.क्र.९२/३१, दि.०१ जानेवारी, २००४.
(२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सीबीसी-१२ /२०१२/ प्र.क्र.१२०/मावक, दि.१६ ऑगस्ट, २०१२.

**शासन निर्णय**

भारत सरकारने मागासवर्गीयांच्या योजना प्रभावीपणे राबविणे, त्यांचेवर नियंत्रण ठेवणेसाठी राष्ट्रीय मागासवर्ग आयोग, नवी दिल्ली गठीत केला आहे. या आयोगावर अध्यक्ष, सदस्य आणि सदस्य सचिवांची नियुक्ती करण्यात आली आहे. आयोगाचे कामकाज अधिक परिणामकारकरित्या होण्यासाठी आयोगाचे अध्यक्ष, सदस्य तथा सदस्य सचिव यांना शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सीबीसी-१२/२०१२/प्र.क्र.१२०/मावक, दि.१६ ऑगस्ट, २०१२ अन्वये राज्य अतिथी म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच, राष्ट्रीय मागासवर्ग आयोग, नवी दिल्ली यांचे अध्यक्ष, सदस्य आणि सदस्य सचिव हे ज्या ज्या वेळी कार्यालयीन दौऱ्यावर महाराष्ट्र राज्यात येतील त्या त्या वेळी त्यांना राज्य अतिथी म्हणून त्यांना त्यांच्या दर्जानुसार खालील अटींच्या अधीन राहून सुविधा पुरविण्यात आल्या आहेत.

(क) राजशिष्टाचार, वाहन, निवास तथा भोजनाची सुविधा फक्त कार्यालयीन दौ-यातच उपलब्ध राहील.

(ख) या सुविधा कमाल तीन दिवसांसाठी उपलब्ध राहतील.

२. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७/१२/३१, दि.२५.०७.२०१२ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात आला आहे. सामाजिक न्याय विभागाचे विभाजन होऊन सन २०१७ मध्ये इतर मागास बहुजन कल्याण विभागाची निर्मिती करण्यात आली आहे. त्यामुळे आता प्रस्तूत बाबीसाठी होणारा खर्च सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या लेखाशीर्षाखाली करण्याऐवजी इतर मागास बहुजन कल्याण विभागाव्दारे सदर बाबीसाठी होणारा खर्च “मागणी क्र.झेडजी-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण (०१)(०२) राज्य मागासवर्ग आयोग (अनिवार्य) (२२२५एफ३५२) १३, कार्यालयीन खर्च” या लेखाशिर्षाखाली त्या आर्थिक वर्षामध्ये केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात येऊन खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२१७१७०७३०३५३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRAKASH SHRIDHAR DHAWLE

Digitally signed by PRAKASH SHRIDHAR DHAWLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BQCKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eadb2369514cf114fb080a75acc2ae8dcf8591b733bb6f63612246049721dfca, pseudonym=2BF6B5481DE84CDE63CFEFC05E5DE7C77F8FBC87, serialNumber=60C3A22DD966735D3A1B24AA927CFEE6BED87B4A378083D720DF90D57B2125D8, cn=PRAKASH SHRIDHAR DHAWLE
Date: 2023.02.17 17:11:53 +05'30'

**( प्रकाश श्री. धावले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव तथा मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार), मंत्रालय, मुंबई.
२) सदस्य सचिव, राष्ट्रीय मागासवर्ग आयोग, नवी दिल्ली.
३) खाजगी सचिव, मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
४) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग.
६) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे.
७) कक्ष अधिकारी (रोखशाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) स्वीय सहायक, मा.अपर मुख्य सचिव (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती (मावक).

****